गरीब व गरजू व्यक्तींना स्वस्त दरात उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या योजनेचे नाव Beams प्रणालीवर “शिवभोजन योजना” असे दर्शविण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : शिभोथा-१३२३/प्र.क्र.५६/नापु-१७**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१/२/२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील गरीब व गरजू जनतेला सवलतीच्या दरात भोजन उपलब्ध करुन देण्यासाठी दि.०१ जानेवारी, २०२० च्या शासन निर्णयान्वये “शिवभोजन योजना” दि. २६ जानेवारी, २०२० पासून सुरु करण्यात आली आहे.

शिवभोजन योजना ही शासनाची महत्वकांक्षी योजना असून मागील ३ वर्षापासून सुरळीतपणे चालू आहे. BEAMS प्रणालीवर या विभागाच्या मागणी क्र. एम ०२ मध्ये Scheme and Heads या शीर्षाखाली २४०८०७७२ Subsidy for 10 Rupees Thali Scheme-33 subsidies असे नमूद असल्याने BEAMS प्रणालीमध्ये योजनेचे नाव “शिवभोजन योजना” असे दर्शविण्याकरीता उचित बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. राज्यातील गरीब व गरजू जनतेला सवलतीच्या दरात शिवभोजन उपलब्ध करुन देण्याकरिता राबविण्यात येणाऱ्या योजनेची आर्थिक तरतूद नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने मागणी क्र. एम २ मुख्य लेखाशीर्ष २४०८ अन्न, साठवण व वखार ०१- अन्न, १०१- प्रापण व पुरवठा (०३) प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण, (०३) (२३) १० रुपये थाळी-योजनेसाठी अर्थसहाय्य (कार्यक्रम) (२४०८०७७२) ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली करण्यात आलेली आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे सदर लेखाशीर्ष मंजूर करताना लेखाशीर्षामध्ये वापरण्यात आलेल्या “१० रुपये थाळी योजनेसाठी अर्थसहाय्य” ऐवजी सदर योजनेचे नाव “शिवभोजन योजना” असे करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार या योजनेच्या लेखाशीर्षामध्ये खालील प्रमाणे बदल करण्यात येत आहे.

२४०८ अन्न, साठवण व वखार
०१ अन्न, १०१- प्रापण व पुरवठा
(०३) प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण
(०३) (२३) शिवभोजन योजना (कार्यक्रम)
(२४०८०७७२) ३३ अर्थसहाय्य.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२३०२२११५३९३०४९०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR

Digitally signed by CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0496C0C213A3F50C6522CC39AE5DE95E1150AC3287E89C21B1422E313820A2, cn=CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
Date: 2023.02.27 12:25:27 +05'30'

**(चारुशीला तांबेकर)**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (अनापुग्रासं) यांचे खाजगी सचिव
२) सचिव (अनापुग्रासं) यांचे स्वीय सहायक
३) सर्व जिल्हाधिकारी
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
५) वित्तीय सल्लागार व उपसचिव (अनापुवग्रासं) पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
६) सर्व (उपायुक्त) पुरवठा
७) सर्व उपनियंत्रक
८) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
९) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१०) सर्व तहसीलदार
११) सर्व गट विकास अधिकारी
१२) सर्व मुख्याधिकारी
१३) वित्त विभाग
१४) नियोजन विभाग
१५) निवड नस्ती (नापु १७).